२९ ऑगस्ट, पद्मश्री डॉ. विठ्ठलराव विखे पाटील यांची जयंती राज्यात शेतकरी दिन म्हणून साजरा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शेदिजा-२०१२/प्र.क्र.१५०/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
**मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.**
तारीख: **१६ ऑगस्ट, २०१४**

***वाचा-***

१) कृषि आयुक्ताल याचे पत्र क्र. कृमावि/शे.दिन/ विप्र-४/ ४७१/२०१२, दि. ९जुलै, २०१२
२) कृषि आयुक्ताल याचे पत्र क्र. कृमावि/शे.दिन/विप्र-४/७६९/२०१४, दि. २५/१/२०१४.

***प्रस्तावना-***

राज्यामध्ये कामगार दिन, महिला दिन, आरोग्य दिन, बाल दिन, अपंग दिन, कृषि दिन याप्रमाणे वेगवेगळया विभागामार्फत वेगवेगळे दिन साजरे केले जातात. तथापि, राज्यातील जनतेला आवश्यक असलेले धान्य, फळे, भाजीपाला, पुरवठा करुन त्याची गरज भागविणा-या शेतक-यांसाठी कोणताही असा विशेष दिन साजरा केला जात नाही.

महाराष्ट्रातील शेतक-यांची सामाजिक, आर्थिक परिस्थिती खालावलेली असताना शेतक-यांची सामाजिक, आर्थिक उंची वाढविण्यासाठी पद्यमश्री डॉ.विठ्ठलराव विखे पाटील यांनी भरीव कार्य केले आहे. त्यांच्या शेतक-यांसाठीच्या कार्याबद्दल त्यांना डॉक्टरेट ही पदवी बहाल करण्यात आलेली आहे. पद्यमश्री डॉ.विठ्ठलराव विखे पाटील यांनी शेतकरी म्हणून शेतक-यांकरिता केलेल्या भरीव कार्याचे स्मरणे व्हावे व राज्यातील सर्व शेतक-यांचा सन्मान म्हणून दि. २९ ऑगस्ट हा त्यांचा जन्म दिवस शेतकरी दिन म्हणून साजरा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

***शासन निर्णय-***

दि. २९ ऑगस्ट हा दिवस राज्यात प्रतिवर्षी शेतकरी दिन म्हणून साजरा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. शेतकरी दिनाचे कार्यक्रम आयोजनासाठी शेतक-यांकरिता चहापाणी, मंडप, हारतुरे, फोटो, फ्लेक्स, प्रदर्शन इ. बाबींवर होणा-या खर्चासाठी निधीची आवश्यकता असते. गाव पातळीवर प्रती ग्रामपंचायत किमान रु. १५००/- तालुका स्तरावर प्रत्येकी किमान रु. २५००/- तसेच जिल्हा स्तरावर प्रती जिल्हा रुपये ५०००/- याप्रमाणे खर्च करण्यात येईल.

३. सन २०१४ या वर्षी ग्रामपंचायत स्तरावर २७,९०६/- ग्रामपंचायती, तालुका स्तरावर ३५६ तालुके आणि जिल्हा स्तरावर ३३ जिल्हयांमध्ये शेतकरी दिन आयोजित करण्यासाठी प्रति ग्रामपंचायत रु. १५०० याप्रमाणे २७,९०६ ग्रामपंचायातीसाठी रु. ४,१८,५९,०००/-, तालुकास्तरावर किमान रु. २५००/- यानुसार ३५६ तालुक्याकरिता रु. ८,९०,०००/- तसेच जिल्हयाच्या मुख्यालयाच्या ठिकाणी शेतकरी दिन साजरा करणेसाठी प्रत्येकी रु. ५०००/- याप्रमाणे एकूण ३३ जिल्हयांकरीता रु. १,६५,०००/-तसेच राज्यस्तरावर

प्रचार व प्रसिध्दीकरीता रक्कम रु. १५,००,०००/- असा एकंदरीत रु. ४,४४,१४,०००/- इतक्या खर्चास शासन मान्यता देत आहे.

४. प्रस्तुत खर्च आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्तरावर उपलब्ध असलेल्या निधीतुन भागविण्यात यावा.

५. शेतकरी दिन साजरा करण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्तालयाने निर्गमित कराव्यात. कृषि आयुक्तालयाच्या मार्गदर्शक सूचनानुसार सदर खर्च करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१९१६५७३३४९०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Hoktuji Chawre

Digitally signed by Siddharth Hoktuji Chawre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharth Hoktuji Chawre
Date: 2014.08.19 16:53:58 +05'30'

**सिध्दार्थ चवरे**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
४. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
५. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
८. सर्व कृषि विद्यापीठांचे कुलगुरु
९. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,अकोला
११. व्यवस्थापकयीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई
१२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई प्रसिध्दीच्या विनंतीसह (५ प्रती)
१३. महालेखाकार १/२, मुंबई/नागपूर.
१४. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ / विधान मंडळ ग्रंथालय (१० प्रतीसह)
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६. सर्व जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
१९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२०. कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
२१. सर्व तालुका कृषि अधिकारी
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२३. सर्व सहसचिव / उपसचिव , कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२४. वसंतराव नाईक, राज्य कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
२५. वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
२६. निवडनस्ती (३ अे)